**पणदरे, ता. बारामती, जि. पुणे ग्रामीण पाणी पुरवठा या योजनेच्या अंदाजपत्रकास व आराखडयास सुधारित प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र. पापुयो२००९/प्र. क्र. ४११/पापु१७,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक :- १४/७/२००९**

**वाचा:-** १) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, पापुयो-२१०४/प्र.क्र.९८/पापु ०६, दि. १३.७.२००४

**प्रस्तावना:-**

पणदरे, ता. बारामती, जि. पुणे ग्रामीण पाणी पुरवठा योजनेच्या रु. १०९०.३५ लक्ष ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तथापि काही तांत्रिक बदलामुळे योजनेच्या खर्चात रु. ४७७.६० लक्ष इतकी वाढ झाली. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण पुणे यांच्याकडून प्राप्त झालेल्या पणदरे, ता. बारामती, जि. पुणे योजनेला सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेमध्ये नमुद केलेल्या बाबींस अनुसरुन पणदरे, ता. बारामती, जि. पुणे या नळपाणी पुरवठा योजनेच्या रुपये १५६७.९५ (रुपये पंधरा लाख सदुसष्ट हजार पंच्याण्णव फक्त) रकमेच्या सुधारित अंदाजपत्रकास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून किमान गरजा कार्यक्रमांतर्गत करावयाच्या तरतुदीचा तपशील या शासन निर्णयासोबतच्या सहपत्रात दर्शविण्यात आला आहे.

२. ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

३. या योजनेच्या मुळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या शासन निर्णयात ज्या सूचना दिलेल्या आहेत, त्याचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच मूळ शासन निर्णयात ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत त्याचेही पालन करण्यांत यावे.

४. ही योजना पूर्ण झाल्यावर ती एकाच महसुली गावासाठी असल्यास संबंधीत ग्रामपंचायतीच्या व एकापेक्षा जास्त महसूली गावासाठी असल्यास संबंधित जिल्हा परिषदेच्या ताब्यात देण्यात येईल. ही योजना संबंधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषदेच्या ताब्यात राहील. संबंधीत अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यासंबंधी संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हापरिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या संबंधित अभियंत्यांनी व संबधित ग्रामपंचायतीच्या/जिल्हा परिषदेच्या अधिका-यांनी संयुक्तपणे पहाणी करावी आणि अशा पहाणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

५. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण , दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुने) याचा दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवी करणे, निधीसाठी किंवा योजनांच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच्या व्यवस्थेसाठी जिल्हा परिषदेस किंवा ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर फी नियम १९६० मधील तरतदींनुसार आकारण्यात येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल अशी पाहण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची/जिल्हा परिषदेची राहील. त्या अनुषंगाने या योजनेकरीता पाणीपट्टीचा दर आकारण्यात यावा. वरीलप्रमाणे दर आकारणी करुनही योजना आर्थिदृष्ट्या स्वयंपूर्ण झाली नाही तर देखभाल दुरुस्तीचा जादा खर्च जिल्हा परिषदेस त्यांच्या इतर उत्पन्नातून भागवावा लागेल. ग्रामपंचायतीने/जिल्हा परिषदेने तशा आशयाचा ठराव केल्याशिवाय योजनेची उर्वरीत कामे हाती घेवू नये.

६. या योजनेवर होणारा हा वाढीव खर्च मागणी क्र. वाय-२,२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता ०१, पाणी पुरवठा १०२,ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम ( बी ) जिल्हा परिषदांना योजना अंतर्गत अनुदाने (०२) (०१) (डब्युएस-६) ( राज्य क्षेत्र) पाणी पुरवठा योजनांसाठी ग्रामपंचायती / जिल्हा परिषदांना अनुदाने (२२१५ १२१७)४१ सहायक अनदाने या अर्थसंकल्पीय शिर्षाखाली केलेल्या तरतुदीतुल भागविण्यात यावा.

७. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. २०५/०९,व्यय ३, दि १२.६.०९ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या बेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०७१४१४५८१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( र. सु. शेटये)
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१.
२) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
३) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे विभाग, पुणे.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
५) जिल्हाधिकारी, पुणे.
६) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, पुणे.
७) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, पुणे
८) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा बांधकाम विभाग, पुणे.
९) संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट,पुणे.
१०) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
११) वरिष्ठ भूवैज्ञाकि, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१२) महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र २, नागपूर.
१३) महालेखापाल, लेखापरीक्षा , महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र २, नागपूर.
१४) प्रधान सचिव,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई.
१६) मा.मंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
१७) मा.राज्यमंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
१८) कार्यासन क्र.पापु-०४,०५,०६,०८,०९,१०,१८ पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय
१९) संगणककक्ष, पाणीपुरवठाव स्वच्छता विभाग, मंत्रालय
२०) निवडनस्ती कार्यासन पापु-१७.

**------- XXXXXX -------**

**(कृ.म.पा)**

शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. पापुयो २००९/प्र.क्र. ४११/पापु१७,
दि. १४/७/२००९ चे सहपत्र

(रु. लाखात)

| योजनेचे नाव | योजनेची मुळ मंजूर किंमत | | | योजनेची सुधारित किंमत | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत मंजूर तरतूद | किमाा गरजा कार्यक्रमां-तर्गत मंजूर तरतूद | एकूण | वर्धित वेग कार्यक्रमां-तर्गत सुधारित तरतूद | किमान गरजा कार्यक्रमां-तर्गत मंजूर तरतूद | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| पणदरे ता. बारामती जि. पुणे | ------- | १०९०.३५ लक्ष | १०९०.३५ लक्ष | -------- | १०९०.३५ + ४७७.६० लक्ष | १५६७.९५ लक्ष |

(र. सु. शेटये)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

D:\PDF\PANDHARE BARAMATI DIST PUNE.doc